महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-१७२४/प्र.क्र.१९/क्रीयुसे-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १३ मार्च, २०२४.

**वाचा:-**

१) समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग शासन निर्णय क्र.राक्रीधो १०९६/प्र.क्र.३३०/क्रीयुसे-१, दि. ३१.७.१९९७
२) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक मराक्रीप/कबड्डी/स्प.अ.सहाय्य/प्रस्ताव/२०२३-२४/का-६/४९२३, दिनांक १२ जानेवारी, २०२४

**प्रस्तावना :-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/संघटनांना संदर्भाधिन क्र. १ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयातील नियम क्र. ११,१२,व १३ अन्वये शासनातर्फे महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. त्यानुसार सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात नाशिक जिल्हा कबड्डी असोशिएशनच्या वतीने घेण्यात येणा-या राज्यस्तरीय कबड्डी स्पर्धांचे आयोजन करण्यात आले असून त्याकरीता रू. २५.०० लक्ष (अक्षरी रूपये पंचविस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील क्रीडा व खेळाच्या विकासासाठी विविध स्तरावर कार्यरत असलेल्या नोंदणीकृत संस्था/संघटनांना महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेच्या निधीतून अधिकृत राज्य/राष्ट्रीय/आंतरराष्ट्रीय स्पर्धा आयोजनाकरिता आर्थिक सहाय्य देण्यात येते. त्यानुसार नाशिक जिल्हा कबड्डी असोशिएशनच्या वतीने घेण्यात येणा-या राज्यस्तरीय कबड्डी स्पर्धेचे आयोजन केले असून त्याकरीता रू. २५.०० लक्ष (अक्षरी रूपये पंचविस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च ““मागणी क्र. ई-०३, २२०४-क्रीडा व युवक सेवा- १०४ क्रीडा व खेळ (०२) (०२) (०३) महाराष्ट्र राज्य क्रीडा परिषदेमार्फत नोंदणीकृत क्रीडा संस्थांना सहायक अनुदान (राज्य)

(कार्यक्रम) (२२०४-१९४३), ३१, सहायक अनुदान (वेतनेवर) ” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदी मधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. तसेच, वितरीत करण्यात आलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात यावे.

३. वित्त विभागाच्या दि.१२ एप्रील, २०२३ व दि.०५ फ़ेब्रुवारी, २०२४ च्या परिपत्रकातील अटी व सूचनानुसार उपरोक्त तरतूद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित उपसंचालक/लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१३१६४६२९२४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2024.03.13 16:56:00 +05'30'

**( ज्ञानेश्वर आव्हाड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल ( लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व परीक्षा ), महाराष्ट्र-१ व २, मुंबई/नागपूर
४. संबंधित विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
५. लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे
६. संबंधित वरीष्ठ कोषागार अधिकारी/जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
७. संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, क्रीडा व युवक सेवा (संचालनालयामार्फत)
८. वित्त विभाग (व्यय-५)/ नियोजन विभाग (का. १४७१), मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव, नाशिक जिल्हा कबड्डी असोशिएशन,नाशिक
११. निवड नस्ती (क्रीयुसे-२ )